GR-200404301432229001-1201

जिल्हा परिषदांच्या अखत्यारीतील मालमत्तांना
भविष्यात कोणत्याही मान्यवरांचे नाव देण्यास
मनाई करण्याबाबत

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय क्रमांक जिपक २००३/प्र.क्र.२३४/ वित्त८(२५)

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक १ मे २००४

वाचा : १) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.आरओडी १०९९ /(२९२/९९) / रस्ते-३, दि. १५ फेब्रुवारी २०००

२) शासन परिपत्रक,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जिपर २०००/ प्र.क्र.३१५/३५, दि.६ फेब्रुवारी २००१

**शासन निर्णय :**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितील रस्ते विकास आराखडयातील रस्ते व पुलांना खालील कारणास्तव भविष्यात कोणत्याही मान्यवरांचे नाव देण्यास मनाई करण्याचा धोरणात्मक निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे.

१) कोणतेही नाव सुचविले असता त्याबाबत मतभिन्नता निर्माण होण्याची शक्यता असते.

२) एकदा ही पध्दत मान्य केल्यास नावे देण्याचे व ते बदलण्याचे वेळोवेळी व जास्त प्रस्ताव प्राप्त होत जातील.

३) नावे देण्यामुळे कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न त्या त्या भागात निर्माण होण्याची शक्यता नाकारता येत नाही.

४) नावे देण्याच्या प्रस्तावास राजकीय स्वरुप येण्याची ब-याच वेळा शक्यता असते

२. याच धोरणाचे आधारे या विभागाने संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकान्वये जिल्हा परिषद रस्त्यांवर पुतळे उभारण्यास तसेच जिल्हा परिषद रस्ते व पुलांना कोणत्याही मान्यवरांचे नाव देण्यास मनाई केली आहे.

३. राज्यातील जिल्हा परिषदांच्या अखत्यारीतील विविध मालमत्तांना नावे देण्यासाठी परवानगी देण्याबाबतच्या अनेक मागण्या विभागास प्राप्त होत असतात. सार्वजनिक बांधकाम विभाग व या विभागाने उपरोक्त स्वीकारलेल्या धोरणानुसार साकल्याने विचार करुन शासनाने

राज्यातील सर्व जिल्हा परिषदांच्या अखत्यारीतील मालमत्तांना भविष्यात कोणत्याही मान्यवरांचे नाव देण्यास मनाई करण्याचा धोरणात्मक निर्णय घेतला आहे.

सदर निर्णयाची अंमलबजावणी तात्काळ करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( सुनिल पाटील)
उप सचिव महाराष्ट्र शासन

प्रत :
मा. राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे अप्पर मुख्य सचिव
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री, ग्राम विकास
मा. राज्यमंत्री, ग्राम विकास
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
प्र.सचिव.ग्राम विकास यांचे स्वीय सहायक
सर्व मंत्रालयीन विभाग.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय.
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/कार्यासने
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
निवड नस्ती कार्यासन परा ८